**विदर्भ वैधानिक विकास मंडळाच्या शिफारशीनुसार राष्ट्रसंत तुकडोजी महाराज नागपुर विद्यापीठ, नागपूर येथे विद्युत परमाणुशास्त्र आणि संगणक विज्ञान विभागाकरिता विविध यंत्र सामुग्री खरेदी करण्यासाठी निधी उपलब्ध करुन देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
उच्च व तंत्रशिक्षण विभाग
शासन निर्णय क्रमांकः एनयुएन - २००९/(१७२/०९)/विशि-२
मंत्रालय विस्तार भवन, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : २६ मार्च, २०१०.

**पहा** :- १) शिक्षण संचालक, उच्च शिक्षण क्र. युएनआय/विवैविमं/२००९-१०/ नावि/विशि-१/६७८५, दि. २८.१.२०१०
२) शासन निर्णय, नियोजन विभाग क्र. विवैमं-१११०/प्र.क्र.४३/का.१४१६, दि. १५ फेब्रुवारी, २०१०

**प्रस्तावना** : विदर्भ वैधानिक विकास मंडळांनी केलेल्या शिफारशीनुसार राष्ट्रसंत तुकडोजी महाराज, नागपूर विद्यापीठाच्या परमाणूशास्त्र आणि संगणक विज्ञान विभागामध्ये विविध यंत्रसामुग्री खरेदी करण्यासाठी रु. ९८.८० लक्ष इतका निधी मंजूर करण्यात आला होता. त्यापैकी नियोजन विभागाने शासन निर्णय क्र. विवैमं-११०९/प्र.क्र.६३९/का.१४१६, दि. १५ फेब्रुवारी, २०१० अन्वये धनादेश क्र. ७९०५८१, रु. ७४.०६ लक्ष एवढा निधी सदरहू विद्यापीठास वितरीत करण्यात आलेला आहे. उर्वरित निधी रु. २४.७४ लाख वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-** विदर्भ वैधानिक विकास मंडळांनी केलेल्या शिफारशीनुसार राष्ट्रसंत तुकडोजी महाराज, नागपूर विद्यापीठाच्या परमाणूशास्त्र आणि संगणक विज्ञान विभागामध्ये विविध यंत्रसामुग्री खरेदी करण्यासाठी रु. २४.७४ लाख (रुपये चोवीस लाख चौ-याहत्तर हजार फक्त) या शासन निर्णयाद्वारे इतकी रक्कम खालील अटी व शर्तीच्या अधीन राहून सदर विद्यापीठास खालीलप्रमाणे कामनिहाय वितरीत करण्यात येत आहे :-

(रुपये लाखात)

| अ.क्र. | कामाचे नांव | मंजूर निधी |
|---|---|---|
| १ | राष्ट्रसंत तुकडोजी महाराज नागपूर विद्यापीठ, अंतर्गत विद्युत परमाणुशास्त्र आणि संगणक विज्ञान विभागामध्ये Human parameters measuring with built in calibration and tester यंत्र खरेदी करण्यासाठी निधी | ४.५५ |
| २ | राष्ट्रसंत तुकडोजी महाराज नागपूर विद्यापीठ, अंतर्गत विद्युत परमाणुशास्त्र आणि संगणक विज्ञान विभागामध्ये Biomedical Instumentation Characteristic testing setup with simulator यंत्र खरेदी करण्यासाठी निधी | ६.९० |
| ३ | राष्ट्रसंत तुकडोजी महाराज नागपूर विद्यापीठ, अंतर्गत विद्युत परमाणुशास्त्र आणि संगणक विज्ञान विभागामध्ये Ultrasound imaging application trainer यंत्र खरेदी करण्यासाठी निधी | ३.२५ |
| ४ | राष्ट्रसंत तुकडोजी महाराज नागपूर विद्यापीठ, अंतर्गत विद्युत परमाणुशास्त्र आणि संगणक विज्ञान विभागामध्ये X-Ray system demonstrative setup यंत्र खरेदी करण्यासाठी निधी | ०.१४ |
| ५ | राष्ट्रसंत तुकडोजी महाराज नागपूर विद्यापीठ, अंतर्गत विद्युत परमाणुशास्त्र आणि संगणक विज्ञान विभागामध्ये Advance therapeutic equipments with demonstrative setup यंत्र खरेदी करण्यासाठी निधी | ९.९० |
| | एकूण | २४.७४ |

**विशेष अटी**

१) सदर खरेदी शासनाच्या प्रचलित नियम, मार्गदर्शक तत्वानुसार जाहीर निविदा बोलावून करण्यात येईल.

२) सदर यंत्रसामुग्री खरेदी केल्यानंतर त्याची देखभाल व दुरुस्ती करण्याची जबाबदारी संबंधीत विभागाची/विद्यापीठाची राहील.

३) सदर यंत्रसामुग्री इतर कोणत्याही योजनेतून प्रस्तावित अथवा मंजूर नाही याची खातरजमा करणे आवश्यक राहील.

**अटी व शर्ती :-**

१) या शासन निर्णयान्वये उपलब्ध करुन देण्यात आलेला निधी बीडीएस मार्फत संबंधित कार्यान्वयीन यंत्रणेला उपलब्ध करुन द्यावा.

२) शासन परिपत्रक नियोजन विभाग क्र. वैविमं-२००९/प्र.क्र.५२३/का-१४१६, दिनांक २९.१०.२००९ मधील रस्त्यांच्या संदर्भात दिलेल्या मार्गदर्शक सुचनांची पुर्तता होते, याची खातरजमा करण्यात यावी.

३) वित्त विभाग शासन निर्णय क्रमांक. संकीर्ण-१०.०२/प्र.क्र.१२८/अर्थोपाय दि. २६.९.२००५ व दि. ६.६.२००८ नुसार कामे पुर्ण झाल्यानंतरच त्याबाबतची रक्कम अदा करण्याची कार्यवाही करावी. कोणत्याही परिस्थितीत कामांसाठी अग्रीम रक्कम मंजूर करण्यात येऊ नये.

४) सदर आदेशानुसार मंजूर केलेला निधी, मासिक निधी वितरणानुसार विनियोगात आणणे आवश्यक राहील.

५) मंजूर निधी नियोजन विभागाने ज्या कामासाठी मान्यता दिली आहे त्याच कामावर खर्च करण्यात यावा व संबंधित यंत्रणांनी (शासकीय यंत्रणा, जि.प./न.पा.) नियमानुसार विहित पध्दतीने कामाची अंमलबजावणी करावी.

६) प्रशासकीय व तांत्रिक मंजूरीच्या आदेशातील तसेच मंडळाच्या मूळ शिफारस पत्रातील अटींचे पालन करण्यात यावे.

७) कामाची पूर्तता झाल्यानंतर तात्काळ एक महिन्याच्या आत उपयोगिता प्रमाणपत्र संबंधित वैधानिक विकास मंडळास सादर करावे.

२. वरील अनुदानाची सर्व कागदपत्रे व हिशेब महालेखापाल, महाराष्ट्र-१ मुंबई किंवा प्रकरणपरत्वे महालेखापाल -२ नागपूर त्यांनी सदर कामाकरीता प्राधिकृत केलेले अधिकारी यांना तपासण्याचे अधिकार असून, त्यांनी मागणी केल्यास, सर्व कागदपत्रे त्यांच्याकडे तपासणी करीता विद्यापीठाने सादर केली पाहिजेत. विद्यापीठास ज्या उद्दिष्टासाठी मंजुर केलेल्या अनुदानाचा वापर त्याच उद्दिष्टासाठी करावा आणि त्याबाबतचे विनियोजन प्रमाणपत्र (Utilisation Certificate)संबंधितांना योग्य वेळी सादर करण्याची दक्षता घेण्यात यावी.

३. उपलब्ध करुन देण्यात आलेला निधी नियोजन विभागाच्या " मागणी क्रमांक-ओ-९-४५१५-इतर ग्रामविकास कार्यक्रमावरील भांडवली खर्च, (००) (०२) वैधानिक विकास मंडळाच्या क्षेत्रांतर्गत विकास कार्यक्रम, २७ लहान बांधकामे (४५१५ ००३९), योजनांतर्गत/दत्तमत " या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

४. हा शासन निर्णय, वित्तीय अधिकार नियम पुस्तिका भाग पहिला उप विभाग तीन मधील अ.क्र. ४- नियम क्रमांक २७(२) (अ) नुसार प्रशासकीय विभागांना प्रदान केलेल्या अधिकारान्वये आणि वित्त विभागाच्या शासन निर्णय क्र. विअप्र-१०.०८/प्र.क्र.७०/२००८/विनियम, दि. १५ मे, २००९ अन्वये प्राप्त झालेल्या अधिकारान्वये तसेच वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक २६७/१०/अर्थ-८, दिनांक २० मार्च, २०१० अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.govt.in या संकेत स्थळावर उपलब्ध करुन देण्यात आला असून त्याचा संकेतांक क्रमांक २०१००३२७१८५४५४००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने.

( रा. गो. जाधव )
उपसचिव, महाराष्ट्र शासन

प्रति,

१) मा. राज्यपाल तथा कुलपती यांचे प्रधान सचिव, राजभवन, मलबार हील, मुंबई,
२) संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे,
३) कुलगुरु, राष्ट्रसंत तुकडोजी महाराज नागपूर विद्यापीठ, नागपूर
४) कुलसचिव, राष्ट्रसंत तुकडोजी महाराज नागपूर विद्यापीठ, नागपूर
५) सहसंचालक ( उच्च शिक्षण) नागपूर विभाग, नागपूर
६) महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता)-१/२ महाराष्ट्र, मुंबई / नागपूर
७) महालेखापाल, (लेखा परीक्षण) -१/२ महाराष्ट्र, मुंबई / नागपूर
८) जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे/नागपूर
९) नियोजन विभाग, (का-१४७१) मंत्रालय, मुंबई.

१०) वित्त विभाग,(व्यय-५) ( अर्थसंकल्प-३/८) मंत्रालय, मुंबई.
११) सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई.
१२) मा. प्रधान सचिव,उच्च व तंत्र शिक्षण विभाग, यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई
१३) उप सचिव (विशि), उच्च व तंत्र शिक्षण विभाग, यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई
१४) अवर सचिव (साशि-१), उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई,
१५) निवड नस्ती (विशि-२)

My Documents\Nilima\G.R\१७२.०९.doc